महाराष्ट्र आंतरराष्ट्रीय शिक्षण मंडळ (MIEB) रद्द करण्यास मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२०२०/प्र.क्र.४६/एसडी-६**

मादम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक: ३० मार्च, २०२०

<u>वाचा:-</u> १) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.शैगुवा-२०१६/(२९/१६)/एसडी-६, दिनांक १४ ऑक्टोबर, २०१६

२) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.शैगुवा-२०१७/(१५२/१७)/एसडी-६, दिनांक ३० नोव्हेंबर, २०१७

३) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.शैगुवा-२०१७/प्र.क्र.१५२/१७/एसडी-६, दिनांक ०२ जानेवारी, २०१८ व दिनांक १५ डिसेंबर, २०१८

४) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.शैगुवा-२०१८/प्र.क्र.२/१८/एसडी-६, दिनांक १२ मार्च, २०१८

५) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.शैगुवा-२०१८/प्र.क्र.४३/१८/एसडी-६, दिनांक ०५ मे, २०१८

<u>प्रस्तावना:-</u>

राज्यातील मुलांना आंतरराष्ट्रीय दर्जाचे उत्तम शिक्षण मिळावे, यासाठी १४ ऑक्टोबर २०१६ रोजी प्रथम टप्प्यात आंतरराष्ट्रीय शैक्षणिक दर्जाच्या १०० शाळा निर्माण करण्याबाबत शासन निर्णय निर्गमित करण्यात आला. याबाबतचा प्रस्ताव दि.१४ डिसेंबर, २०१७ च्या मंत्रिमंडळ बैठकीमध्ये सादर करण्यात येवून आंतरराष्ट्रीय दर्जाच्या शाळा तयार करण्यासाठी राज्यात महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाशिवाय एक नवीन महाराष्ट्र आंतरराष्ट्रीय शिक्षण मंडळ (Maharashtra International Education Board) स्वयं अर्थसहाय्यित तत्वावर स्थापन करणे व सदर मंडळाची स्थापना संस्था अधिनियम, १८६० अन्वये नोंदणी करणेबाबत निर्णय घेण्यात आला. त्यानुसार संदर्भाधीन क्रमांक (३) येथील दि. २ जानेवारी, २०१८ रोजी शासन निर्णय निर्गमित करण्यात आला. सुरूवातीच्या मंत्रीमंडळ निर्णयाप्रमाणे सदर मंडळाची स्थापना स्वयं अर्थसहाय्यित तत्वावर करण्यात आली होती. परंतु, सदर मंडळाचा दैनंदिन व कार्यालयीन खर्च मोठ्या प्रमाणात वाढत असल्यामुळे सदर निर्णय बदलून मंडळाचा स्वतःच्या उत्पन्नाचा स्त्रोत निर्माण होईपर्यंत, म्हणजेच महाराष्ट्र आंतरराष्ट्रीय शिक्षण मंडळाशी संलग्न असलेल्या शाळा नैसर्गिक वाढीनुसार इयत्ता १० वी पर्यंत येईपर्यंत, पुढील १० वर्ष मंडळास प्रती वर्षी रु. १० कोटी सहाय्यक अनुदान स्वरुपात उपलब्ध करुन देण्याबाबतचा दि. ११ डिसेंबर, २०१८ च्या मंत्रीमंडळ बैठकीमध्ये निर्णय घेण्यात आला.

महाराष्ट्र आंतरराष्ट्रीय शिक्षण मंडळासाठी शाळांची निवड करताना ज्या शाळा आधीपासूनच उत्तम दर्जाच्या आहेत व महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाशी संलग्न असताना व राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र या राज्याच्या शैक्षणिक प्राधिकरणाने तयार केलेल्या अभ्यासक्रमाचा उपयोग करून उत्तम कामगिरी करणाऱ्या शाळांचीच निवड करण्यात आली. तसेच, शिक्षकांची निवड करतानासुध्दा पूर्वीपासून उत्तम काम करणाऱ्या शिक्षकांची मुलाखत घेऊन निवड करण्यात आली. या दोनही कारणांमूळे महाराष्ट्र आंतरराष्ट्रीय शिक्षण मंडळाच्या शाळांचा दर्जा चांगला दिसतो. या शाळांव्यतिरिक्त महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाशी संलग्न सुमारे २९१ शाळादेखील आंतरराष्ट्रीय दर्जाच्या झालेल्या आहेत ही वस्तुस्थिती आहे.

**महाराष्ट्र आंतरराष्ट्रीय शिक्षण मंडळाची स्थापना करण्यात आल्याने पुढील प्रश्न निर्माण झाल्याचे निदर्शनास आले आहे:-**

१. सर्व मुलांना एक समान गुणवत्तापूर्ण शिक्षण देण्याचे शासनाचे धोरण असताना सरकारने स्वत:च मोजक्याच मुलांसाठी उच्च दर्जाच्या आंतरराष्ट्रीय शाळा निर्माण करण्यासाठी संलग्नता देणे योग्य आहे काय, असा आक्षेप घेण्यात येत आहे.

२. महाराष्ट्र आंतरराष्ट्रीय शिक्षण मंडळ व राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र, पुणे यांना प्राप्त तरतुद व त्यांनी केलेल्या खर्चाचा तुलनात्मक अभ्यास केला असता, असे दिसते की, महाराष्ट्र आंतरराष्ट्रीय शिक्षण मंडळाचा प्रतिशिक्षक खर्च राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र, पुणे यांनी प्रतिशिक्षक केलेल्या खर्चाच्या तुलनेत खूपच जास्त आहे. राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र प्रशिक्षणावर प्रतिशिक्षक रू.१,०००/- खर्च करते तर, महाराष्ट्र आंतरराष्ट्रीय शिक्षण मंडळ प्रशिक्षणावर प्रतिशिक्षक रू.६४,०००/- खर्च केल्याचे दिसून येते. तसेच मंडळाच्या पाठ्यपुस्तक निर्मितीसाठी मोठ्या प्रमाणावर निधी उपलब्ध करून देण्यात आला.

३. बालकाचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ (RTE) नुसार राज्याचे शैक्षणिक प्राधिकरण राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र (SCERT) आहे. त्यामुळे कोणत्याही नवीन अभ्यासक्रमास राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र, पुणे यांची

मान्यता घेणे आवश्यक आहे. परंतु, महाराष्ट्र आंतरराष्ट्रीय शिक्षण मंडळाशी संलग्न करण्यात आलेल्या शाळांसाठी तयार करण्यात आलेल्या अभ्यासक्रमासंदर्भात तसे करण्यात आले नाही.

४. मानव संसाधन विकास मंत्रालयामार्फत राष्ट्रीय शैक्षणिक धोरण, २०२० अंतिम करण्यात येत आहे. यानुसार देशातील प्रत्येक राज्यातील शालेय शिक्षणाच्या अभ्यासक्रमाची पुनर्रचना करावी लागणार आहे आणि त्यानुसार नवीन पाठ्यपुस्तकाची निर्मिती करावी लागणार आहे. इयत्ता १० वी व १२ वी ची परीक्षा घेण्यासाठी जी यंत्रणा असावी लागते तशी समांतर यंत्रणा महाराष्ट्र आंतरराष्ट्रीय शिक्षण मंडळासाठी निर्माण करावी लागणार होती. त्यामुळे वेगळयाने मोठ्या प्रमाणावर वित्तीय तरतूद करावी लागणार होती.

वरील सर्व बाबींचा साकल्याने विचार करून राज्यात शासनाची दोन वेगवेगळी शिक्षण मंडळे कार्यतर असणे योग्य ठरणार नाही त्यामुळे महाराष्ट्र आंतरराष्ट्रीय शिक्षण मंडळ रद्द करण्याची बाब मा. मंत्रिमंडळापुढे विचारार्थ होती. मा मंत्रीमंडळाने घेतलेल्या निर्णयानुसार शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णयः-</u>**

महाराष्ट्र आंतरराष्ट्रीय शिक्षण मंडळाच्या स्थापनेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात आलेले संदर्भाधीन सर्व शासन निर्णय रद्द करण्यात येत आहेत. राज्यात सर्व विद्यार्थ्यांना समान संधी मिळावी तसेच राज्याचे दोन अभ्यासक्रम असू नयेत तसेच, दोन शिक्षण मंडळे असू नयेत व राष्ट्रीय शैक्षणिक धोरण, २०२० धोरणानुसार सर्व विद्यार्थ्यांना आंतरराष्ट्रीय दर्जाचे शिक्षण मिळण्यासाठी शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

१) महाराष्ट्र आंतरराष्ट्रीय शिक्षण मंडळ रद्द करण्यात यावे. सदर मंडळांतर्गत शाळांना पुन: महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाशी संलग्नित करण्यात यावे.

२) राज्यातील सर्व शाळांसाठी नवीन शैक्षणिक धोरणानुसार आंतरराष्ट्रीय दर्जाचा अभ्यासक्रम राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी तयार करावा.

महाराष्ट्र आंतरराष्ट्रीय शिक्षण मंडळामध्ये बहुतांश अधिकारी/कर्मचारी राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र कार्यालयातील आंतरराष्ट्रीय गुणवत्ता कक्षातून प्रतिनियुक्तीद्वारे घेण्यात आले आहेत, त्यांना मूळ आस्थापनेवर परत पाठविण्यात यावे. कंत्राटी / बाहयस्त्रोत पध्दतीने नियुक्त केलेल्या कर्मचाऱ्यांच्या सेवा समाप्त करण्यात याव्यात. उपरोक्त

निर्णयाची आंमलबजावणी करण्यासाठी स्वतंत्रपणे कार्यपध्दतीबाबतचे आदेश निर्गमित करण्यात येतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००३३०१३०९०८९६२१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Vandana Krishna
Date: 2020.03.30 13:12:20 +05'30'

**( वंदना कृष्णा )**
**अपर मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबाई.
२) मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. मंत्री ( शालेय शिक्षण ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा. राज्यमंत्री, ( शालेय शिक्षण ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
७) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई.
८) संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र, पुणे.
९) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र, राज्य, पुणे.
१०) शिक्षण संचालक (प्राथमिक), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११) सचिव, महाराष्ट्र आंतरराष्ट्रीय शिक्षण मंडळ, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२) सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक.
१३) प्राचार्य, जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था (सर्व).
१४) सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक व उच्च माध्यमिक)/
१५) सर्व शिक्षण निरीक्षक, बृहन्मुंबई महानगरपालिका.
१६) प्रशासन अधिकारी, महानगरपालिका, (सर्व).
१७) निवड नस्ती (कार्यासन एसडी-६).